**जनहित याचिका क्र.८५/२००७ मध्ये दाखल करण्यात आलेल्या अवमान याचिका (लॉजिंग) क्र.३/२०१७ आवाज फाउंडेशन आणि इतर विरुध्द श्री.शिलवंत ढवळे, सहायक पोलिस आयुक्त, माहिम विभाग, मुंबई.**

**ध्वनी प्रदूषण नियमांचे काटेकोरपणे पालन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन परिपत्रक क्र. सीआरटी-०३१४/प्र.क्र.६४/विशा-५.**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २४ मे, २०१७.

वाचा :-

१) शासन परिपत्रक क्र.डिआयएस ०९०/प्र.क्र.४३४ (भाग-२)/विशा-१ब, दिनांक २८/०२/२०१७.
२) शासन पुरकपत्र क्र.डिआयएस ०९०/प्र.क्र.४३४ (भाग-२)/विशा-१ब, दिनांक ०३/०४/२०१७.

**प्रस्तावना :-**

मा. उच्च न्यायालयात दाखल जनहित याचिका क्र.८५/२००७ मध्ये दाखल करण्यात आलेल्या अवमान याचिका (लॉजिंग) क्र.३/२०१७ च्या अनुषंगाने मा.उच्च न्यायालयात दिनांक ०३/०५/२०१७ रोजी सुनावणी झाली. सदर सुनावणीच्या वेळी पोलीस आयुक्तालयाने राज्यातील विविध सण उत्सव इ. तसेच विविध कार्यक्रम साजरे होत असताना, शांतता क्षेत्रात आवाजाची पातळी ओलांडून कायद्याचे उल्लंघन होऊ नये याकरिता सर्व संबंधित पोलीस अधिकाऱ्यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रामध्ये असलेल्या शांतता क्षेत्रामध्ये ध्वनी प्रदूषण (विनियमन व नियंत्रण) नियम, २००० नियमांचे काटेकोरपणे पालन करण्याबाबत सर्व संबंधित पोलीस अधिकाऱ्यांना सूचित करण्यात यावे, असे मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी आदेश दिले आहेत.

मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी दिलेल्या आदेशानुसार शांतता क्षेत्रामध्ये होणाऱ्या ध्वनी प्रदूषणाबाबत अधिक काटेकोरपणे नियमांचे पालन होणे व नियमांचा भंग करणाऱ्यांवर कठोर कारवाई होणे आवश्यक असल्याने, यासंदर्भात राज्यातील सर्व पोलीस अधिकाऱ्यांना सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती :-

**परिपत्रक :-**

मा.उच्च न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या जनहित याचिका क्र.१७३/२०१० या याचिकेसंदर्भात मा.उच्च न्यायालयाने दिनांक १०, ११, १२ व १६ ऑगस्ट, २०१६ रोजी दिलेल्या आदेशानुसार दिनांक २८/०२/२०१७ च्या शासन परिपत्रकाद्वारे ध्वनी प्रदूषण नियंत्रणाबाबतची कार्यवाही अधिक प्रभावीपणे करण्यासाठी ध्वनी प्रदूषण संनियंत्रण समिती गठीत केली आहे. मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्देशांची तसेच याबाबत शासनाने व पोलीस महासंचालक कार्यालयाने वेळोवेळी दिलेल्या

निर्देशांची / सूचनांची योग्य प्रकारे अंमलबजावणी होत आहे किंवा नाही याची सर्वस्वी जबाबदारी सदर संनियंत्रण समितीला देण्यात आली आहे.

आता मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल जनहित याचिका क्र.८५/२००७ संदर्भात दाखल करण्यात आलेल्या अवमान याचिकेवर दिनांक ०३ मे, २०१७ रोजी झालेल्या सुनावणी दरम्यान मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशानुसार, शांतता क्षेत्रामध्ये विविध सण, उत्सव व कार्यक्रमा दरम्यान आवाजाची पातळी (लाऊडस्पीकर, डी.जे., मिरवणुका व तत्सम वाद्य यांच्या आवाजामुळे) ओलांडून ध्वनी प्रदूषण (विनियमन व नियंत्रण) नियम, २००० मधील नियमांचे उल्लंघन होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. तसेच आवाजाची पातळी (लाऊडस्पीकर, डी.जे., मिरवणुका, लग्न वरात व तत्सम वाद्य यांच्या आवाजामुळे) ओलांडून ध्वनी प्रदूषण (विनियमन व नियंत्रण) नियम, २००० मधील नियमांचे काटेकोरपणे पालन करावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०५२४१३२७३२६८२९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vijay D Patil

Digitally signed by Vijay D Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5254aa09c72b0eb445f264826ab10bb42793fc26e3838113296e7ff812051f6f, cn=Vijay D Patil
Date: 2017.05.24 13:46:49 +05'30'

**( विजय पाटील )**
**उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. सर्व मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४. महाराष्ट्रातील सर्व मा.संसद सदस्य
५. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद
६. मा.विरोधी पक्षनेता, विधान सभा
७. सर्व मा.विधान परिषद / विधान सभा सदस्य
८. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
९. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालयीन विभाग
१०. अध्यक्ष, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ, महाराष्ट्र राज्य, मुंबई
११. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१३. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई

१४.पोलीस आयुक्त (सर्व)
१५.परिक्षेत्रीय विशेष पोलीस महानिरीक्षक (सर्व)
१६.जिल्हाधिकारी तथा जिल्हादंडाधिकारी (सर्व)
१७.जिल्हा पोलीस अधिक्षक (सर्व)
१८. सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१९.गृह विभाग / विशा-५
२०.निवड नस्ती.